महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:मासैध्व-२०१०/१३०७/प्र.क्र.३३०/२०१०/२८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०१.१२.२०१०.

# शासन निर्णय

माजी सैनिकांच्या कल्याणकारी कार्यक्रमासाठी संपूर्ण भारतात ७ डिसेंबर हा "ध्वजदिन" म्हणून पाळण्यात येतो व त्या निमित्ताने ७ डिसेंबर ते पुढील वर्षाच्या नोंव्हेंबरपर्यंत निधी गोळा केला जातो. भारताच्या संरक्षणासाठी ज्यांनी आपले प्राणार्पण केले, अशा जवानांच्या कुटुंबियांच्या जीवनातील अडी-अडचणी दूर करून त्यांचे दैनंदिन जीवन सुसहय व्हावे, यासाठी त्याचप्रमाणे युध्दात अपंगत्व प्राप्त झालेल्या आणि सशस्त्र दलातून निवृत्त झालेल्या जवानांच्या पुनर्वसनाच्या विविध कल्याणकारी योजना राबविण्यासाठी या निधीचा विनियोग केला जातो.

२. अलिकडच्या काळात मे १९९९ पासून जम्मु-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळ निर्माण झालेली युध्दजन्य तणावाची परिस्थिती हाताळताना अथवा देशातील सर्वच क्षेत्रात/अतंर्गत सुरक्षा मोहिमेत/चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सैन्य दलातील तसेच सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्करी दलातील महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांना राज्य शासनातर्फे प्रत्येकी रु.५ लाख इतकी आर्थिक मदत दिली जाते. ही एक वेळची आर्थिक मदत शहीद जवानाची विधवा पत्नी, आई/वडील, यांच्यामध्ये विभागून दिली जाते. तसेच देशातील कोणत्याही क्षेत्रात/अंतर्गत सुरक्षा मोहिमेत/चकमकीत अपंगत्व आलेल्या सैन्यदलातील तसेच सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्करी दलातील महाराष्ट्रातील अधिकारी/जवानांना त्यांच्या अपंगत्वाचे प्रमाण लक्षात घेऊन रूपये १ लाख व रूपये ३ लाख पर्यंत आर्थिक मदत राज्य शासनातर्फे दिली जाते.

३. सैनिकांप्रती समाजाचे काही ऋण आहे. देशाच्या सीमांचे आणि स्वातंत्र्याचे प्राणपणाने रक्षण करतानाच, देशात उद्‌भवणा-या कायदा आणि सुव्यवस्थाविषयक समस्या, अतिवृष्टी, वादळे किंवा भूकंपासारख्या आपत्तीत दुर्देवी नागरीकांच्या सहाय्याला त्वरेने धावून जाऊन बहुमोल कामगिरी बजावणा-या आपल्या सैनिकांचे हे ऋण अल्पस्वल्प स्वरूपात फेडण्याची संधी जनतेला ध्वजदिनाच्या निमित्ताने प्राप्त होत असते.

४. माजी सैनिकांच्या पुनर्वसनाच्या विविध कल्याणकारी योजना राबविण्याकरीता, ध्वजदिन निधीपैकी बहुतांशी रक्कम उपलब्ध करून दिली जाते हे लक्षात घेऊन २०१०-२०११ या वर्षाचा या राज्याचा इष्टांक रूपये अठरा कोटी ठरविण्यात आला आहे. सदरहू रक्कम दिनांक ७ डिसेंबर, २०१० ते ३० नोव्हेंबर, २०११ या कालावधीत जमा करावयाची आहे. परंतु शासनाची अशी अपेक्षा आहे की मे, २०११ पर्यंत दिलेल्या उद्दीष्टाच्या ७५% आणि ऑगस्ट, २०११ पर्यंत ९०% उद्दीष्ट गाठण्याचे जिल्हाधिकारी यांनी कालबध्द कार्यक्रम आखून प्रयत्न करावेत. प्रत्येक जिल्हयातून ध्वजदिन निधी जमा करण्याचा इष्टांक सोबतच्या विवरणपत्रात दिलेला आहे.

५. जिल्हा स्तरावर निधी गोळा करण्याच्या या कार्यक्रमाचे संयोजन जिल्हाधिकारी करतील व त्यांच्या अध्यक्षतेखाली पुढे नमूद केलेल्या अधिका-यांची समिती काम करील :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | --- | अध्यक्ष, |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | --- | सदस्य, |
| ३) | जिल्हा पोलीस अधीक्षक व/ अथवा पोलीस उप आयुक्त | --- | सदस्य, |
| ४) | जिल्हा उद्योग अधिकारी | --- | सदस्य, |
| ५) | शिक्षणाधिकारी | --- | सदस्य, |
| ६) | जिल्हा प्रसिध्दी अधिकारी | --- | सदस्य, |
| ७) | जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी | --- | सदस्य सचिव |

हा कार्यक्रम यशस्वी व्हावा या दृष्टीकोनातून जिल्हाधिकारी वरील सदस्यांव्यतिरिक्त जिल्हयातील कोणत्याही अधिका-यास आवश्यकतेप्रमाणे या समितीमध्ये सदस्य म्हणून समाविष्ट करु शकतील. त्याचप्रमाणे जिल्हयातील माजी सैनिकांच्या पुनर्वसनामध्ये ज्यांना रस आहे, अशा काही ज्येष्ठ माजी सैनिक अधिका-यांचा किंवा शासकीय व्यक्तिचाही समावेश या समितीमध्ये जिल्हाधिकारी करु शकतील तसेच जिल्हयातील उद्योग, सहकार, व्यापार, शैक्षणिक इत्यादी क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींचा समावेश जिल्हाधिकारी या समितीमध्ये करू शकतील. परंतू या समितीची एकूण सदस्य संख्या २० पेक्षा अधिक असू नये.

६. निधी गोळा करण्याच्या कामी अत्यल्प निधी देणारे लहानसहान देणगीदारही फार मोलाचे ठरतात. उदा.जिल्हयातील प्रत्येक शासकीय, निम-शासकीय किंवा खाजगी शाळांतील प्रत्येक विद्यार्थ्यांकडून जरी प्रत्येकी एक रूपया एवढी देणगी गोळा केली, तरी अशा रितीने एकत्रित झालेला निधी हा मोठया प्रमाणात जमा होत असतोच शिवाय लहानसहान गटांना निधी गोळा करण्याच्या कामी सामावून घेतल्याने, जिल्हयातील प्रत्येक कुटुंबात सहभागाची/सहकार्याची भावना आपोआपच निर्माण होते. जिल्हयामध्ये कशा पध्दतीने निधी गोळा करावा, त्यासाठी विविध क्षेत्रातील व्यक्ती आणि संस्था यांचा सहभाग या कार्यक्रमात कसा असावा, तसेच हा कार्यक्रम यशस्वी व्हावा या दृष्टीकोनातून प्रसिध्दीचे माध्यम काय असावे व शासनाच्या विविध विभागांना, तसेच जिल्हा परिषद, नगर परिषद, केंद्र व राज्य शासकीय कार्यालये, अनुदानित संस्था, शैक्षणिक व इतर संस्था, कारखाने, सहकारी बँका, सहकारी संस्था यामध्ये इष्टांकाचे वाटप कसे करण्यात यावे, याबाबतचा विचार उपरोक्त समितीने करावा.

७. जिल्हाधिकारी यांनी आपापल्या जिल्हयात ध्वजदिन निधी गोळा करण्याच्या कार्याचा शुभारंभ पालकमंत्र्याच्या हस्ते केला जाईल असे प्रयत्न करावेत व या शुभारंभास यथायोग्य प्रसिध्दी द्यावी. मुंबईमध्ये शुभारंभाचा हा कार्यक्रम प्रतिवर्षी मा.राज्यपालांच्या हस्ते राजभवनात केला जात असतो. या वर्षीही त्याप्रमाणे हा कार्यक्रम मुंबई जिल्हाधिकारी आणि मुंबई उपनगर जिल्हाधिकारी यांनी संयुक्तपणे घडवून आणावा. या कार्यक्रमास अपर मुख्य सचिव (माजी सैनिक कल्याण), सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन व संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी उपस्थित रहावे.

८. अ) ध्वजदिन निधी गोळा करताना त्यामध्ये कोणत्याही प्रकारे अपहार अथवा गैरप्रकार होणार नाही किंवा तक्रारीला वाव राहणार नाही याची पुरेपुर दक्षता घेण्यात यावी व त्याबाबतच्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्याकडून याबाबत सविस्तर सूचना सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी यांना निर्गमित करण्यात येतील. जनतेकडून निधी गोळा करण्यासाठी खालील पध्दतीचा अवलंब करण्यात यावा :-

१) लहान ध्वज, मोटारीवर लावण्याचे ध्वज देणे.

२) जनतेकडून देणगी स्वीकारुन त्याबद्दलची पावती देणे.

ध्वजदिन निधी गोळा करण्याबाबतची डबा पध्दत बंद करण्यात आलेली असून फक्त ध्वजदिन निधी संकलनाच्या शुभारंभाच्या कार्यक्रमात सिलबंद डबे उपयोगात आणता येतील. डब्यावर अनुक्रमांक टाकण्यात येउुन किती डबे वापरात आणावयाचे आहेत याबाबत मा. जिल्हाधिकारी यांची टिप्पणीवर मंजूरी घेण्यात यावी. तसेच कार्यक्रमानंतर मा. जिल्हाधिकारी यांच्या आदेशानुसारच्या गठित समितीसमोर डबे उघडण्यात येवून प्राप्त निधी बाबतच्या अहवालानुसार निधी संबंधित खात्यात त्वरित जमा करण्यात यावा.

ब) ध्वजदिन निधी संकलनासाठी पुरविण्यात आलेले त्या त्या वर्षाचे साहित्य हे त्या त्या वर्षीच वापरायचे असून त्या ध्वजदिन वर्षात उपयोगात न आणले गेलेले साहित्य कोणत्याही परिस्थितीत पुढच्या ध्वजदिन वर्षासाठी वापरण्यात येऊ नये. तसेच मागील ध्वजदिन वर्षाचे प्रलंबित निधी / साहित्य जमा करुन हिशोब प्राधान्याने पूर्ण करण्यात यावा, याबाबतच्या सूचना जिल्हाधिकारी यांच्यामार्फत जिल्हयातील ध्वजदिन निधी संकलन करणा-या यंत्रणांना निर्गमित करण्यात याव्यात. अशाप्रकारे वापरात आलेल्या ध्वजदिन निधी साहित्याचा हिशोब पूर्ण करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी यांची राहील.

क) कोणत्याही प्रकारच्या माजी सैनिक संघटनांना सशस्त्र सेना ध्वजदिन निधी संकलित करता येणार नाही.

९. ध्वजदिन निधीस द्यावयाचे योगदान हे जिल्हा स्तरावर जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी यांचे कार्यालयात "जिल्हाधिकारी व अध्यक्ष, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय" आणि विभागीय स्तरावर "संचालक, सैनिक कल्याण विभाग" यांच्या नावाने धनादेशाद्वारे जमा करण्यात यावे. वरील पध्दतीनुसार गोळा केलेल्या निधीचा हिशेब व नोंद

वही जिल्हाधिकारी कार्यालयात नीटपणे ठेवण्याची जबाबदारी जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी किंवा ज्या अधिका-यांकडे जिल्हयात हा कार्यभार सोपविला आहे, त्यांचेवर असेल.

वरील जिल्हा समितीची बैठक महिन्यातून कमीत कमी एक वेळा घेण्यात यावी व त्या बैठकीमध्ये प्रत्येक महिन्यात किती निधी गोळा करण्यात आला याचा आढावा घेऊन त्यासंबधीची माहिती संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्याकडे प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत पाठवावी व संचालक, सैनिक कल्याण विभाग, यांनी सर्व जिल्ह्यांचा दरमहा एकत्रित अहवाल प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत सामान्य प्रशासन विभागाला सादर करावा.

१०. जरी ध्वजदिन निधी गोळा करण्याचा कालावधी ७ डिसेंबर, २०१० ते नोव्हेंबर, २०११ असा असला, तरी डिसेंबर ते मे हा कालावधी सर्वसाधारणपणे सुबत्तेचा असतो. त्या दृष्टीकोनातून दिलेल्या इष्टांकाच्या ७५% निधी मे, २०११ अखेरपर्यंत गोळा केला जाईल, अशा त-हेने जिल्हा समितीने नियोजन करावे.

११. विभागीय स्तरावर, विभागीय आयुक्त यांनी जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी आणि इतर संबधीत विभागीय अधिकारी यांच्या नियमित बैठका घेऊन जिल्हावार ध्वजदिनाचा दिलेला इष्टांक पूर्ण करण्यासाठी करण्यात येत असलेले प्रस्ताव व जमा केलेला निधी यासंबधीचा आढावा घ्यावा आणि प्रत्येक जिल्हयास दिलेले उद्दीष्ट पूर्ण होईल, या दृष्टीकोनातून संनियंत्रण करावे.

१२. सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या विभागाच्या अधिकार क्षेत्रात काम करणा-या क्षेत्रिय, जिल्हा आणि तालुका स्तरावरील कार्यालये आणि इतर संस्था यांना या कामासाठी सर्वतोपरी सहाय्य/मदत करुन जास्तीत-जास्त निधी गोळा करण्याकरिता कसोशीने प्रयत्न करण्याबाबतच्या सूचना सर्व संबधितांना देण्याची कृपया दक्षता घ्यावी.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २००९१०३०१६२१२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
**(के. पी. बक्षी )**
**प्रधान सचिव,(सेवा)**
**सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव,
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषंदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा/मूळ शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग ,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागाध्यक्ष आणि कार्यालय प्रमुख,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे - ४११ ००६,
संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद
राज्य शासनाची सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व महानगरपालिका, नगरपालिका आयुक्त,
सर्व नगरपरिषंदाचे मुख्याधिकारी
माहिती व जनसंपर्क महासंचालक (प्रसिध्दी पत्रक काढण्याच्या विनंतीसह),
शिक्षण संचालक /उच्च शिक्षण संचालक /तंत्र शिक्षण संचालक /कृषि संचालक /पशुसंवर्धन संचालक /वैद्यकीय शिक्षण वसंशोधन संचालक,
महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती)

* पत्राने.

# ध्वजदिन निधी - २०१०- संकलन इष्टांक

| अ. क्र. | जिल्हा | इष्टांक | अ. क्र. | जिल्हा | इष्टांक |
|---|---|---|---|---|---|
| **कोकण विभाग** | | | **अमरावती विभाग** | | |
| १ | मुंबई शहर | १,५०,००,००० | २५ | अमरावती | ४५,००,००० |
| २ | मुंबई उपनगर | १,५०,००,००० | २६ | बुलढाणा | २५,५०,००० |
| ३ | ठाणे | १,०५,००,००० | २७ | अकोला | ३६,००,००० |
| ४ | रायगड | ३४,५०,००० | २८ | वाशिम | २४,००,००० |
| ५ | रत्नागिरी | ३३,००,००० | | यवतमाळ | २२,५०,००० |
| ६ | सिंधुदुर्ग | १९,५०,००० | **एकूण** | | **१,५३,००,०००** |
| **एकूण** | | **४,९२,००,०००** | | | |
| **नाशिक विभाग** | | | **नागपूर विभाग** | | |
| ७ | नाशिक | ६९,००,००० | ३० | नागपूर | ९९,००,००० |
| ८ | धुळे | ३३,००,००० | ३१ | वर्धा | ३३,००,००० |
| ९ | नंदुरबार | १६,५०,००० | ३२ | भंडारा | १५,००,००० |
| १० | जळगांव | ६३,००,००० | ३३ | गोंदिया | १५,००,००० |
| ११ | अहमदनगर | ९९,००,००० | ३४ | चंद्रपूर | २१,००,००० |
| **एकुण** | | **२,८०,५०,०००** | ३५ | गडचिरोली | १२,००,००० |
| | | | **एकूण** | | **१,९५,००,०००** |
| **पुणे विभाग** | | | | | |
| १२ | पुणे | १,३२,००,००० | **विभाग** | | |
| १३ | सातारा | १,०६,५०,००० | १ | कोकण विभाग | ४,९२,००,००० |
| १४ | सांगली | ९९,००,००० | २ | नाशिक विभाग | २,८०,५०,००० |
| १५ | सोलापूर | ७९,५०,००० | ३ | पुणे विभाग | ५,०२,५०,००० |
| १६ | कोल्हापूर | ८५,५०,००० | ४ | औरंगाबाद विभाग | १,७७,००,००० |
| **एकूण** | | **५,०२,५०,०००** | ५ | अमरावती विभाग | १,५३,००,००० |
| **औरंगाबाद विभाग** | | | ६ | नागपूर विभाग | १,९५,००,००० |
| १७ | औरंगाबाद | ४९,५०,००० | **एकूण** | | **१८,००,००,०००** |
| १८ | जालना | १६,५०,००० | | | |
| १९ | परभणी | १५,००,००० | | | |
| २० | हिंगोली | १०,५०,००० | | | |
| २१ | बीड | १६,५०,००० | | | |
| २२ | नांदेड | १६,५०,००० | | | |
| २३ | उस्मानाबाद | ३१,५०,००० | | | |
| २४ | लातूर | २१,००,००० | | | |
| **एकूण** | | **१,७७,००,०००** | | | |